# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन आदेश क्रमांकः एएससी १५१४/प्र.क्र.९७/२०१४/१४-अ

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २१ जूलै,२०१४

## कार्यालयीन आदेश

बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक (गट क) (सेवा प्रवेश) नियम २००६ दि.३१ मे २००६ च्या कलम ३ मधील अटींची पूर्तता करणाऱ्या मंत्रालयीन विभागातील खालील गट ड संवर्गामधील कर्मचाऱ्यांना लिपिक-टंकलेखक पदावर नियमित स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागात करण्यात येत आहे

| अ. क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | श्री.सं.मा.लाड (भ.ज.-क) | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| २ | श्री.उ.स.कांबळे (अ.जा.) | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग | कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग |
| ३ | श्री.दे.शं.वारेशी | सार्वजनिक बांधकाम विभाग | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ४ | श्री.ना.रा.दोडके (अ.जा.) | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |
| ५ | श्री.ल.र.नाईक | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

२. सर्वश्री सं.मा.लाड, दे.शं.वारेशी व ना.रा.दोडके यांनी सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.आरटीआर १४०३/८४/प्र.क्र.५४/०३/१३ दि.१० मे २००५ मधील तरतुदी नुसार संगणक अर्हता (MS-CIT) प्राप्त केल्याचे प्रमाणपत्र या आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत सादर करणे आवश्यक आहे.

३. उपरोक्त पदोन्नत गट ड मधील कर्मचाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतन निश्चितीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकपासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील ११ (१) (ए) खालील तरतूदीनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२११४५७१७९४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADIK SUCHITA M

Digitally signed by MAHADIK SUCHITA M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MAHADIK SUCHITA M
Date: 2014.07.21 14:56:52 +05'30'

**(सुचिता मो.महाडिक)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,

२. प्रधान सचिव/सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/ कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग / सहकार व पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

३. सह सचिव/ उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/ पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/ कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग / सहकार व पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. संबंधित कर्मचारी (विभागामार्फत)

५. निवडनस्ती/ कार्यासन १४-अ संग्रहार्थ.